जुलै ते ऑक्टोबर, २०२४ (मुख्यत: माहे सप्टेंबर व ऑक्टोबर) या कालावधीत विविध जिल्ह्यात अतिवृष्टी/ पूर यामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीपोटी बाधितांना मदत देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सीएलएस २०२५/प्र.क्र. १९/म-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकी.क्र.६७/म-११,दि.२४.०१.२०२३.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३,दि.२७.०३.२०२३
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.२७२/म-३,दि.०१.०१.२०२४
४) शासन निर्णय, समक्रमांकाचे दि.०५.०९.२०२४, दि.२०.०९.२०२४, दि.२३.०९.२०२४, दि.३०.०९.२४ , दि.०४.१०.२४, दि. १०.१२.२४
५) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.मशा/कार्या-६/नै.आ./माहे सप्टेंबर २०२४/शे.पि.नुक./२०२५ दि.१४.०१.२०२५.
६) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र उपआ/नैआ/पूनर्व/म.स.कावि-०४/२०२४ दि.१७.०१.२०२५
७) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.-०३/नैआ /कावि/४०४/२०२४ दि.१०.१२.२०२४.
८) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.-०३/नैआ /कावि/४०३/२०२४ दि.०४.१२.२०२४.
९) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.-०३/नैआ /कावि/४१६/२०२४ दि.२०.१२.२०२४.
१०) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/टंचाई/शेतीपिक नुकसान-ज- दि.१२.१२.२०२४.
११) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/टंचाई/शेतीपिक नुकसान-ज- दि.१९.१२.२०२४.
१२) विभागीय आयुक्त, नागपुर यांचे पत्र क्र.मशा-०७(०५) /नै.आ.व्य./वर्धा-ऑक्टो.२४का.वि.-४९६/२०२४ दि.१२.१२.२०२४.
१३) विभागीय आयुक्त, नागपुर यांचे पत्र क्र.मशा-०७(०५) /नै.आ.व्य./नागपुर-सप्टें.२४का.वि.-५००/२०२४ दि.१३.१२.२०२४.
१४) विभागीय आयुक्त, नागपुर यांचे पत्र क्र.मशा-०७(०५) /नै.आ.व्य./नागपुर जुलै व ऑगस्ट २४/ का.वि.-४४/२०२५ दि.२९.०१.२०२५.
१५) विभागीय आयुक्त, नागपुर यांचे पत्र क्र.मशा-०७(०५) /नै.आ.व्य./गडचिरोली-ऑक्टो.२४का.वि.-४०/२०२४ दि.२७.०१.२०२५.

**प्रस्तावना:-**

अतिवृष्टी, पूर व चक्रीवादळ यासारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्यास पुढील हंगामामध्ये उपयोगी पडावे याकरिता शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान (Input subsidy) स्वरूपात एका

हंगामात एक वेळेस याप्रमाणे राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून विहित दराने मदत देण्यात येते. तसेच, राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या इतर मान्य बाबींकरिता देखील विहित दराने मदत देण्यात येते. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७.०३.२०२३ अन्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे निकष व दर विहित करण्यात आले आहेत. केंद्र शासनाने विहित केलेल्या १२ नैसर्गिक आपत्तींव्यतिरिक्त राज्य शासनाने दि.३०.०१.२०१४ अन्वये अवेळी पाऊस, अतिवृष्टी, वीज कोसळणे, समुद्राचे उधाण व आकस्मिक आग या स्थानिक आपत्तींमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना मदत देण्याचे धोरण निश्चित केले आहे. तसेच, दि.२२.६.२०२३ च्या शासन निर्णयान्वये सततचा पाऊस ही नैसर्गिक आपत्ती घोषित करण्यात आली आहे. संदर्भ क्र.३ येथील दि.०१.०१.२०२४ च्या शासन निर्णयानुसार नोव्हेंबर, २०२३ मधील अवेळी पाऊस व गारपीट यामुळे झालेल्या व त्यापुढील कालावधीसाठी अवेळी पाऊस व गारपीट व इतर नैसर्गिक आपत्तीमुळे होणाऱ्या शेतीपिकांच्या नुकसानीकरिता सुधारित दराने २ ऐवजी ३ हेक्टरपर्यंत मदत अनुज्ञेय करण्यात आली आहे.

जुलै ते ऑक्टोबर, २०२४ (मुख्यत: माहे सप्टेंबर व ऑक्टोबर २०२४) या कालावधीत "अतिवृष्टी/पूर" यामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी विभागीय आयुक्त यांचेकडून निधी मागणीचे प्रस्ताव शासनास प्राप्त झाले आहेत. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

जुलै ते ऑक्टोबर, २०२४ (मुख्यत: माहे सप्टेंबर व ऑक्टोबर २०२४) या कालावधीत राज्यात विविध जिल्ह्यात अतिवृष्टी/पूर यामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी शेतकऱ्यांना मदत देण्याकरिता संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या दरानुसार एकूण **रु. ७३३४५.८४ लक्ष (अक्षरी रुपये सातशे तेहतीस कोटी पंचेचाळीस लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रात दर्शविल्याप्रमाणे उपलब्ध तरतुदीमधून अथवा आवश्यकतेनुसार पुर्नविनियोजनाव्दारे तरतुद उपलब्ध करुन घेऊन कार्यासन म-११ यांनी हा निधी वितरित करावा.

३. संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथे नमूद दि.२४.०१.२०२३ अन्वये सूचित केल्यानुसार DBT पोर्टलव्दारे लाभार्थ्यांना थेट त्यांच्या बँक खात्यात निधी वितरीत करण्यात यावा. सोबतच्या प्रपत्रामधील सर्व लाभार्थ्यांची माहिती विहित नमुन्यात काळजीपूर्वक तयार करुन संबंधित अधिकाऱ्यांनी ती संगणकीय प्रणालीवर भरुन मान्यतेबाबत नियमानुसार कार्यवाही करावी. तथापि,

अ) चालू हंगामामध्ये यापूर्वी सर्व विभागांना शेतीपिकांच्या नुकसानीकरिता वितरीत करण्यात आलेल्या मदतीच्या निधीमध्ये या प्रस्तांवातर्गत मागणी करण्यात आलेल्या निधीचा समावेश नाही याची दक्षता घ्यावी. एका हंगामात एक वेळेस याप्रमाणे विहित दराने मदत देण्यात येत असल्याची खात्री करावी.

ब) शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.०१.०१.२०२४ नुसार जिरायत पिके, बागायत पिके व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदतीच्या विहित दरानुसार जास्तीत जास्त ३ हेक्टरच्या मर्यादेत असल्याची खातरजमा करण्यात यावी.

क) कोणत्याही लाभार्थ्यांना मदत देतांना व्दिरुक्ती होणार नाही याची तहसिल व जिल्हाधिकारी कार्यालयाने कटाक्षाने काळजी घ्यावी.

४. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन सर्व शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. ही मदत देताना नैसर्गिक आपत्तीकरिता विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याची खात्री सर्व संबंधितांनी करावी.

५. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्ह्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा. या आदेशाव्दारे तसेच यापूर्वी वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाव्दारे नैसर्गिक आपत्तीमध्ये शेतकऱ्यांना दिलेला मदतीचा निधी बँकांनी कर्ज खात्यात अथवा अन्यथा वसुलीसाठी वळती करु नये याकरिता जिल्हाधिकारी यांनी सर्व बँकांना आवश्यक त्या सूचना निर्गमित कराव्यात. या सर्व सूचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

६. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा व उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने

निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

७. वरील प्रयोजनसाठी, संदर्भ क्र.२, दिनांक २७.०३.२०२३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या निकषानुसार व दरानुसार, २ हेक्टर मर्यादेतील शेतीपिक नुकसानीचा खर्च मागणी क्र.सी-६; मुख्य लेखाशिर्ष २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य; (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च; (९१) (०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पिकनुकसानीकरिता शेतकऱ्यांना सहाय्य (अनिवार्य); ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (सशर्त) (२२४५ २४५२) या लेखाशीर्षाखाली भागविण्यात येईल.

तसेच, संदर्भ क्र.०३, दि.०१.०१.२०२४ च्या शासन निर्णयान्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या निकषाबाहेर देण्यात येणाऱ्या मदतीच्या वाढीव दराच्या अनुषंगाने ० ते २ हेक्टर मर्यादेतील वाढीव दर तसेच २ ते ३ हेक्टर मर्यादेतील शेतीपिक नुकसानीचा खर्च मागणी क्र.सी-६; मुख्य लेखाशिर्ष २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य; (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च; (९२)(१२) नैसर्गिक आपत्तीमुळे पिकनुकसानीकरिता शेतकऱ्यांना सहाय्य (अनिवार्य); ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (सशर्त) (२२४५ २३०९) अंतर्गत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्याप्रमाणे खर्च करण्यात यावा.

सदरचा खर्च आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून/ पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध केलेल्या निधीमधून खर्च करण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०२२८१७४५४६७२१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2025.02.28 17:47:06 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
५. मा. मंत्री (मदत, पुनर्वसन व आपत्ती व्यवस्थापन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,

७. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
८. प्रधान सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सर्व संबंधित विभागीय आयुक्त
१०.वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
११.संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१२.सर्व संबंधित जिल्हाधिकारी
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१४.महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१५.सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी
१६.कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१७.वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१८.निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२५/प्र.क्र.१९/म-३, दि. २८ फेब्रुवारी,२०२५ सोबतचे प्रपत्र**

**जुलै ते ऑक्टोबर, २०२४ मध्ये शेतीपिकांच्या झालेल्या नुकसानीकरिता वितरित करावयाच्या निधीचा लेखाशिर्षनिहाय तपशिल**

| अ. क्र. | विभाग | जिल्हा | प्रस्तावाचा दिनांक | बाधित क्षेत्र - हेक्टर | बाधित शेतकरी संख्या | निधी (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | कोकण | ठाणे | १४.०१.२०२५ | २३.४० | १०९ | ३.२ |
| **२** | | पालघर | | २७७२.६९ | २७३० | ९६७.१ |
| **३** | | रायगड | | २२.२५ | ११३ | ३.२५ |
| **४** | | रत्नागिरी | | ३.९९ | ६१ | १.२१ |
| **५** | | सिंधूदुर्ग | | २६.७४ | १९६ | ५.२ |
| **एकूण विभागिय आयुक्त कोंकण** | | | | **२८४९.०७** | **३२०९** | **९७९.९६** |
| ६ | अमरावती | अमरावती | १७.०१.२०२५ | ६५३.२२ | १०६५ | ८९.१७ |
| ७ | | अकोला | | १४४९३.८७ | १४७०६ | २२७३.८६ |
| ८ | | यवतमाळ | | ३३९.२५ | ९२५ | ४८.०३ |
| ९ | | बुलडाणा | | २१८०३९.७३ | २३७२९६ | ३००३५.६ |
| १० | | वाशिम | | १.६० | ४ | ०.४७ |
| **एकूण विभागिय आयुक्त अमरावती** | | | | **२३३५२७.६७** | **२५३९९६** | **३२४४७** |
| **११** | **पुणे** | सातारा | १०.१२.२०२४ | ४०४.३५ | ९३२ | ६८.५१ |
| **१२** | | सांगली | ०४.१२.२०२४ | ३६१८.५० | ८१९९ | ८०५.६५ |
| **१३** | | पुणे | २०.१२.२०२४ | १७७७.६९ | ७९५१ | २६०.१६ |
| **एकूण विभागिय आयुक्त पुणे** | | | | **५८००.५४** | **१७०८२** | **११३४.३** |
| १४ | | नाशिक | १२.१२.२०२४ | ५.२९ | १६ | १.०१ |
| ५ | | धुळे | | ६८७.०२ | १५४१ | ९३.७३ |
| १६ | | नंदुरबार | | १९७.३७ | ३१६ | ३६.२६ |
| १७ | | जळगाव | | ९९६६.२५ | १५४४० | १४००.४३ |
| १८ | | अहमदनगर | | ६६३.१५ | १२२४ | ७०.९४ |
| | | **एकूण** | | **११५१९.०८** | **१८५३७** | **१६०२.४** |
| १९ | | नाशिक | १९.१२.२०२४ | १०४७९४.०५ | १८२३७४ | १९३०७.८ |
| २० | | धुळे | | ४९१८.२८ | ९७२७ | ९१९.३६ |
| २१ | | नंदुरबार | | १४६.४८ | ३४१ | २३.४५ |

| अ. क्र. | | जिल्हा | | बाधित क्षेत्र - हेक्टर | बाधित शेतकरी संख्या | निधी (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| २२ | | जळगाव | | १०४३१८.७९ | १३८२३८ | १४४८९.९ |
| २३ | | अहमदनगर | | १३६.०२ | ३२७ | २३.३२ |
| | | **एकूण** | | **२१४३१३.६२** | **३३१००७** | **३४७६४** |
| **एकूण विभागीय आयुक्त, नाशिक** | | | | **२२५८३२.७०** | **३४९५४४.००** | **३६३६६.२३** |
| २४ | **नागपूर** | वर्धा | १२.१२.२०२४ | ८६३३.९९ | १२९७० | ११७६.०१ |
| २५ | | नागपूर | १३.१२.२०२४ | ८२.६४ | १२३ | १७.९९ |
| २६ | | नागपूर | २९.०१.२०२५ | २७३४.६३ | ३९३३ | ९८४.४६ |
| २७ | | गडचिरोली | २७.०१.२०२५ | १६२३.२१ | २६८५ | २३९.७९ |
| | | **एकूण विभागीय आयुक्त, नागपूर** | | **१३०७४.४७** | **१९७११.००** | **२४१८.२५** |
| | | **एकूण राज्य** | | **४८१०८४.४५** | **६४३५४२.००** | **७३३४५.८४** |